सन २०२३-२४ या निवडसूची वर्षात स्थापत्य अभियांत्रिकी सहायक (गट-क) यांना कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (गट-ब) (अराजपत्रित) पदावर देण्यात आलेली पदोन्नती रद्द करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक-पदोन्न-२०२४/प्र.क्र.३२६/सेवा-३**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग**
**मंत्रालय, मुंबई- ४०००३२.**
**दिनांक : ३ मार्च, २०२५**

**संदर्भ- १. शासन आदेश क्र. पदोन्न-२०२४/प्र.क्र.३२६/सेवा-३, दि.११.१०.२०२४**
**२. शासन समक्रमांक ज्ञापन दि.२८.०१.२०२५ व दि.०६.०२.२०२५**

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन आदेशान्वये सन २०२३-२४ च्या निवडसूचीतील स्थापत्य अभियांत्रिकी सहायक (गट-क) यांना कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (गट-ब) (अराजपत्रित) पदावर वेतनस्तर एस-१५ रु.४१८००-१३२३०० या वेतनश्रेणीत या आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात आली आहे. सदर आदेशान्वये पदोन्नतीप्राप्त अभियंत्यांनी पदस्थापना केलेल्या ठिकाणी या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत रुजू होण्याच्या सूचना देण्यात आलेल्या होत्या. तथापि, खालील तक्त्यात नमूद केलेले अभियंते विहीत मुदतीत पदोन्नतीच्या पदावर रुजू झाले नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले.

| क्र. | पदोन्नतीप्राप्त अभियंत्याचे नाव | देण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|
| १. | श्री.प्रसन्न प्रकाश नरोले | सा.बां.मंडळ, गडचिरोली अंतर्गत सा.बां. उपविभाग, कोरची येथील रिक्त पदी |
| २. | श्री.भैया महादेव रामटेके | मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर अंतर्गत मुंबई रस्ते विकास व संकल्पचित्र उपविभाग क्र.८, वडाळा येथील रिक्त पदी |
| ३. | श्री.सुनिल गजानन दातारकर | रा.म.मंडळ, कोकण भवन अंतर्गत रा.म.उपविभाग, रत्नागिरी येथील रिक्त पदी |

२. सदर अभियंत्यांनी पदोन्नतीच्या पदस्थापनेवर तात्काळ रूजू व्हावे, अन्यथा त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल, याबाबत त्यांना संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२८.०१.२०२५ व दि.६.०२.२०२५ रोजीच्या ज्ञापनान्वये कळविण्यात आले होते. त्यांपैकी श्री.भैय्या रामटेके यांनी तूर्तास पदोन्नतीच्या

पदावर रुजू होण्यास इच्छुक नसल्याचे कळविले आहे, तसेच शासनातर्फे ज्ञापन दिल्यानंतरही श्री.प्रसन्न नरोले व श्री.सुनिल दातारकर अद्यापपर्यंत पदोन्नतीच्या पदावर रुजू झालेले नाहीत. ही बाब कार्यालयीन शिस्तीस अनुसरुन नाही. रुजू न होऊन त्यांनी शासन आदेशाचा भंग केलेला आहे. यावरुन या तीनही अभियंत्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजु होण्यास स्वारस्य दिसून येत नाही. तसेच, त्यांना पदोन्नतीची आवश्यकता नसल्याचे किंवा ते पदोन्नतीस इच्छुक नसल्याचे स्पष्ट होते. तरी, श्री.प्रसन्न नरोले, श्री.भैय्या रामटेके व श्री.सुनिल दातारकर या तीनही अभियंत्यांची पदोन्नती या आदेशाद्वारे रद्द करण्यात येत आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०३१२१११७३६१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

POOJA BHASKAR UDAWANT

Digitally signed by POOJA BHASKAR UDAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=3a216aeb67842b82e08ea38ee54173f5a527cd40299fd7cb135e0abc12d5ab49, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C0BDDEC9E386D4BD1D8C49113A8F429650B2609DEA0BDA6E1ED8FD55A0D6A5FD, cn=POOJA BHASKAR UDAWANT
Date: 2025.03.03 12:12:35 +05'30'

**(पुजा भा.उदावंत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर/अमरावती/मुंबई,
४. मुख्य अभियंता (राष्ट्रीय महामार्ग), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकणभवन, नवी मुंबई,
५. सर्व संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,
६. मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव,
७. अपर मुख्य सचिव (सा.बां.वि). यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०. सह सचिव (सं.नि.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. संबंधित स्थापत्य अभियांत्रिकी सहायक यांना संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांचे मार्फत,
१२. कार्यासन अधिकारी (आस्था-१), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कार्यासन सेवा-३ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.